मुख्यमंत्री ग्रामसडक योजने अंतर्गत कोल्हापूर जिल्ह्यातील पॅकेज क्र.RD-KOL-८२ मधील प्रजिमा ४६ बेनिक्रे ते हळदवडे रस्ता ता.कागल जि.कोल्हापूर या रस्त्याच्या कामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** मुग्रायो-२०२३/प्र.क्र.१३०२/बांधकाम-४
५ वा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख: २९ जुलै २०२४.

**वाचा :**

१) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः मुग्रायो-२०२०/प्र.क्र.८२/बांधकाम-४, दिनांक ३०/०३/२०२०.**
२) **मुख्य अभियंता, (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे यांचे पत्र क्रमांकः मु.अ./प्रमंग्रासयो/४४०८/२०२३,दिनांक ३१/१०/२०२३.**

**प्रस्तावना :**

मुख्यमंत्री ग्रामसडक योजने अंतर्गत कोल्हापूर जिल्ह्यातील पॅकेज क्र.RD-KOL-८२ मधील प्रजिमा ४६ बेनिक्रे ते हळदवडे रस्ता ता.कागल जि.कोल्हापूर या रस्त्याच्या कामास ग्राम विकास विभागाच्या उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक १ येथील दिनांक ३०/०३/२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये रू.३१४.५६लक्ष इतक्या रकमेची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर कामाचा कार्यारंभ आदेश दिनांक २३/०६/२०२० रोजी देण्यात आला आहे.

०२. सदर रस्त्याच्या जादा दराच्या स्वीकृत निविदेमुळे किंमतीमधील वाढ तसेच भाववाढ कलमाअंतर्गत देय रक्कम इत्यादीमुळे सदर कामाच्या मुळ किंमतीमध्ये वाढ झाल्याने सुधारीत प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव, मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे यांच्या उक्त वाचा मधील अ.क्र.२ येथील दिनांक ३१/१०/२०२३ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेला आहे.

**०३.** विषयांकित रस्त्याच्या कामाच्या GST दर तसेच भाववाढ कलमाअंतर्गत देय रक्कम इत्यादीमुळे सदर कामाच्या मुळ किंमतीमध्ये वाढ झाल्याने सदर कामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेंतर्गत कोल्हापूर जिल्ह्यातील पॅकेज क्र.RD-KOL-८२ मधील प्रजिमा ४६ बेनिक्रे ते हळदवडे रस्ता ता.कागल जि.कोल्हापूर या रस्त्याच्या कामात प्रस्तावनेत नमुद कारणांमुळे किंमतीमध्ये वाढ झाल्याने सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता आहे.

०२. उपरोक्त प्रमाणे कामाच्या अंतिम किंमतीमध्ये खालील प्रमाणे वाढ होत आहे.

(रू. लक्ष)

| पॅकेज क्रमांक | कामाचे नाव | प्रशासकीय मान्यता किंमत | स्वीकृत निविदा रक्कम | सुधारीत खर्च | प्रशासकीय मान्यता रक्कमेपेक्षा अधिकचा खर्च | प्रशासकीय मान्यता रकमेपेक्षा जास्तीच्या खर्चाची टक्केवारी |
|---|---|---|---|---|---|---|
| *1* | *2* | *3* | *4* | *5* | *6* | *7* |
| RD-KOL-८२ | प्रजिमा ४६ बेनिक्रे ते हळदवडे रस्ता ता.कागल जि.कोल्हापूर | ३१४.५६ | ३०२.२४ | ३६१.६९ | ४७.१३ | १४.९८% |
| Total | | ३१४.५६ | २५५.८६ | ३६१.६९ | ४७.१३ | १४.९८% |

०३. उपरोक्त आर्थिक विश्लेषनानुसार काम पुर्ण करावयाचे झाल्यास रू.३६१.६९ लक्ष इतका अंतिम खर्च असुन, सदर कामाच्या प्रशासकीय रक्कमेच्या १४.९८ % जास्तीचा म्हणजेच रू.४७.१३ लक्ष जास्तीचा आहे.

०४. वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग पहिला उप विभाग तीन अनुच्छेद क्र.६ (२७ अ) नुसार, सुधारीत अंदाजातील अधिक्य सुरूवातीस मंजूर केलेल्या अंदाजित खर्चाच्या १५ % मर्यादेपर्यंत मंजुर करण्याचे पुर्ण अधिकार प्रशासकीय विभागास आहे. त्यानुसार मुख्यमंत्री ग्राम सडक योजने अंतर्गत कोल्हापूर जिल्ह्यातील पॅकेज क्र.RD-KOL-८२ मधील प्रजिमा ४६ बेनिक्रे ते हळदवडे रस्ता ता.कागल जि.कोल्हापूर या रस्त्याच्या कामास रू.३६१.६९ लक्ष इतक्या रकमेस खालील नमुद केलेल्या अटींच्या अधीन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४.१ सदर काम ग्राम विकास विभागाच्या अधिनस्त असलेल्या महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेमार्फत, प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेच्या धर्तीवर व ग्राम विकास विभागाच्या अटी व शर्तीवर कार्यान्वीत करण्यात यावीत.

४.२ ज्या कारणाकरिता अधिक्याचा प्रस्ताव प्राप्त झाला आहे, तो या कामाकरिताच्या मंजुर निविदेमधील सर्व अटी, शर्ती (Terms and Conditions) व तरतूदींच्या अनुषंगानेच आहे, याची खातरजमा ठेकेदारास प्रत्यक्ष अधिक्याची रक्कम प्रदान करण्यापूर्वी करावी.

४.३ कामाची अंमलबजावणी करताना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा व विहित निविदा कार्यपद्धती अनुसरण्यात यावी.

४.४ सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी, निविदाविषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहित धरली जाणार नाही.

४.५ सदर कामांची नोंद मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेसाठी तयार करण्यात आलेल्या संगणक प्रणालीमध्ये संबंधित कार्यकारी अभियंता यांनी त्वरीत करावी.

४.६ या कामावरील खर्च सुधारित अंदाजित खर्चाच्या मर्यादेत ठेवण्यात यावा व त्यापेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

**०५.** सदर कामावरील खर्च "मागणी क्र. एल-७, ५०५४, मार्ग व पूल यावरील भांडवली खर्च ०४, जिल्हा व इतर ग्रामीण मार्ग ३३७, रस्त्यांची बांधकामे (००)(०१), मुख्यमंत्री ग्रामीण मार्ग योजना नवीन रस्ते बांधणे व अस्तित्वातील रस्त्यांचे नुतनीकरण, ५३ मोठी बांधकामे सीआरसी-५०५४ ५१५३" या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक 202407291111189420 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2024.07.29 14:27:25 +05'30'

**(प्रशांत पाटील)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
२. जिल्हाधिकारी, कोल्हापूर,
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर,.
४. मुख्य अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास
५. संस्था, कॅम्प ऑफीस, पुणे.
६. खाजगी सचिव, मा. मंत्री (ग्रा.वि.), मंत्रालय, मुंबई-३२.
७. मा.अ.मु.स. (ग्रा.वि. व पं.रा.), ग्राम विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. मा.सचिव, (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९. अधीक्षक अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, पुणे विभाग, .
१०. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कोल्हापूर,
११. कार्यकारी अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, जिल्हा कोल्हापूर,.
१२. कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, कोल्हापूर,

१३. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर,
१४. वित्तीय सल्लागार, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना.
१५. माहिती तंत्रज्ञान अधिकारी, प्रधानमंत्री / मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र राज्य.
१६. निवड नस्ती (कार्यासन बांधकाम-४) ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.